**मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, मुंबई या संस्थेद्वारे दि.२५ व २६ ऑक्टोबर, २०१५ रोजी आयोजित करण्यात येणा-या पद्मविभूषण श्री. झुबीन मेहता यांच्या “ऑस्ट्रेलियन वर्ल्ड ऑर्केस्ट्रा” या संगीताच्या कार्यक्रमाकरीता करमणूक शुल्क माफी देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः :ईएनटी-२०१५/प्र.क्र.१९६/टी-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ०७ ऑक्टोबर, २०१५

**शासन निर्णय-**

मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, मुबई या संस्थेद्वारे **दि.२५ व २६ ऑक्टोबर, २०१५** रोजी जमशेद भाभा थिएटर, एन.सी.पी.ए., मुंबई येथे आयोजित करण्यात येणा-या **पद्मविभूषण श्री. झुबीन मेहता यांच्या “ऑस्ट्रेलियन वर्ल्ड ऑर्केस्ट्रा”** या संगीताच्या कार्यक्रमास विशेष बाब म्हणून **महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील कलम ६ (३)** अन्वये पुढील अटींच्या अधीन राहून याद्वारे करमणूक शुल्क माफी प्रदान करण्यात येत आहे. -

१) सदर कार्यक्रमांच्या तिकीटांची विक्री सुरु होण्यापूर्वी कार्यक्रमाचे ठिकाण, तिकीटांची रक्कम, तिकीटांची संख्या याबाबत संपूर्ण माहिती मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, मुंबई यांच्या पदाधिका-यांनी जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर येथील अपर जिल्हाधिकारी (करमणूक शुल्क शाखा) यांना उपलब्ध करुन दयावी.

२) सदर कार्यक्रमांकरिता प्राप्त होणा-या प्रायोजकत्वाच्या रकमेची माहिती आवश्यक त्या करारांच्या प्रतींसह कार्यक्रमांच्या पुर्वी दि.२० ऑक्टोबर, २०१५ पर्यंत सदर संस्थेने जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर यांना उपलब्ध करुन द्यावी.

३) सदर कार्यक्रमांव्दारे प्राप्त होणा-या रकमेच्या खर्चाबाबतचे विहित विवरणपत्र लेखापरिक्षणाकरिता दि. ३१ मार्च, २०१६ पर्यंत जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर यांना उपलब्ध करुन द्यावे. यामध्ये विलंब झाल्यास जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर यांनी प्रस्ताव फेरविचारार्थ शासनास सादर करावा.

४) या कार्यक्रमांव्दारे प्राप्त होणा-या रकमेच्या खर्चाबाबत आवश्यक शपथपत्र सदर संस्थेने जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर यांना कार्यक्रमापूर्वी उपलब्ध करुन द्यावे.

५) मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, मुंबई या संस्थेने शपथपत्राद्वारे सूचित केल्यानुसार विहित करण्यात आलेल्या प्रयोजनाकरिता सदर रकमेचा वापर केला नाही, असे आढळून

आल्यास अधिनियमातील तरतुदींनुसार सदर संस्थेविरुध्द आवश्यक कारवाई करण्यात येईल, याची मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, मुंबई यांच्या पदाधिका-यांनी नोंद घ्यावी.

६) वर नमूद करण्यात आलेल्या कार्यक्रमांच्या आयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही करमणूकीच्या कार्यक्रमाबाबत या आदेशाचा वापर केला जाणार नाही. या आदेशात कोणत्याही प्रकारची दुरुस्ती / फेरबदल करण्यात येणार नाही.

(७) उपरोक्त अटींची पुर्तता होते किंवा कसे, याबाबतची दक्षता अपर जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांनी घ्यावी आणि मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, मुबई या संस्थेद्वारे आयोजित उपरोक्त कार्यक्रमांकरिता होणा-या करमणूक शुल्काच्या हानीबाबतची माहिती स्वतंत्रपणे कार्यक्रमाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या कालावधीमध्ये शासनास सादर करावी.

**सदर शासन निर्णय महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम, १९२३ मधील कलम ६ (३) अन्वये राज्य शासनास प्राप्त अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००७१७२३०८३६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad
Madhavrao Doke

Digitally signed by Sharad Madhavrao Doke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SECTION OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49a6844e93d7a1180c3226081e6f456ddf8d7b1bc67bc4bd78fa78029ab559db, serialNumber=b6d84b8aafc59276d709cc7218691343d053ce00524eb05a7fb23fbfe5a5b2c6, cn=Sharad Madhavrao Doke
Date: 2015.10.07 18:29:30 +05'30'

**( शरद डोके )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

- मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
- जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
- अपर जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
- प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहाय्यक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई.
- निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
- श्रीमती मेहरु जीजीभॉय, संस्थापक विश्वस्त, मेहली मेहता म्युझिक फाऊंडेशन, बी/२, बानू मॅंशन्स, खंबाला हिल रोड, मुंबई-४०० ०२६.
- निवड नस्ती, टी-१.